सन २००३-२००४ च्या अर्थसंकल्पातील
मंजूर अनुदानातून पहिला हप्ता
(योजनांतर्गत) महाराष्ट्र मेरीटाईम
बोर्डाकडे वर्ग करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग

शासन निर्णय क्रमांक पीएलएन-०३/००३/सीआर-३९/पीआरटी-१,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२, दिनांक ११ मे,२००३.

**शासन निर्णय** :- शासन निर्णय गृह विभाग क्रमांक इपीटी- १०९६/ प्र.क्र.१३३/परि-५, दि.२२ नोव्हेंबर, १९९६ अन्वये महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाची स्थापना झाल्यामुळे बंदर संघटनेमार्फत कार्यान्वित होत असलेली योजनांतर्गत व योजनेतर कामे बोर्डामार्फत करण्यात येतात. याकरिता शासनाकडून बोर्डाला अनुदान, अर्थसंकल्प, कर्ज वगैरे देण्याची तरतूद महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड अधिनियम १९९६ च्या कलम ७३ मध्ये आहे. सदर कलमाच्या तरतूदीनुसार महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास सहाय्यक अनुदान देणे शक्य व्हावे याकरिता शासन निर्णय, क्रमांक पीएलएन- ०६९७/सीआर-४३/परि-४ दिनांक १५.७.९७ अन्वये लेखाशिर्ष "३०५१- बंदरे व दिपगृहे" व " ३०५६- अंतर्देशिय जलपरिवहन" या लेखाशिर्षाखाली ( योजनेतर व योजनांतर्गत) उपशिर्ष सन १९९७- १९९८ या आर्थिक वर्षापासून उघडण्यास शासन मंजूरी देण्यात आली आहे.

२. सन २००३-२००४ च्या अर्थसंकल्पास विधीमंडळाची पूर्णत: मान्यता मिळेपर्यंत खर्च भागविण्यासाठी विधीमंडळाने महाराष्ट्र विनियोजन (लेखनुदान) विधेयक २००३ मंजूर केले आहे. मुख्यलेखाशिर्ष, "३०५१-बंदरे व दीपगृहे" या खालील तरतूदीचे १/६ अनुदान म्हणजेच रु.२,५७,६६,०००/- (योजनांतर्गत) (दत्तमत) एवढी रक्कम खर्च करण्यास विधीमंडळाने मान्यता दिली आहे. त्याचप्रमाणे लेखाशीर्ष, "३०५६-आंतर्देशीय जलपरिवहन या लेखाशीर्षाखाली एकूण तरतूदीच्या १/६ अनुदान म्हणजेच रु.३४,८५,०००/- (योजनांतर्गत) (दत्तमत) एवढी रक्कम खर्च करण्यास विधीमंडळाने मान्यता दिलेली आहे.

३. सन २००३- २००४ या वर्षाकरीता पहिला हप्ता म्हणून एकूण रुपये २,९२,५१,००० (रुपये दोन कोटी ब्याण्णव लक्ष एकावन्न हजार फक्त) ( योजनांतर्गत) इतके अनुदान खाली दर्शविल्याप्रमाणे महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडे वर्ग करण्याच्या प्रस्तावास शासन याद्वारे मंजूरी देत आहे.

| प्रधान लेखाशिर्ष | सन २००३ - २००४ चे मंजूर अनुदान | पहिल्या हप्त्याची रक्कम |
|---|---|---|
| १. मागणी क्र.बी-७, ३०५१, बंदरे व दिपगृहे ०२, लहान बंदरे १९०, सार्वजनिक क्षेत्र व इतर उपक्रम यांना सहाय्य (दोन) महाराष्ट्र मेरीटाईम बार्डास सहाय्यक अनुदान ( लहान बंदरे विकास (योजनांतर्गत) ( ३०५१- ०७- ०३) | रु.१५,४६,००,००० | रु.२,५७,६६,००० |

| | | |
|---|---|---|
| २. मागणी क्र.बी-३<br>३०५६, अंतर्देशिय जलपरिवहन<br>१९०, सार्वजनिक क्षेत्र व इतर उपक्रम यांना सहाय्य ( दोन) महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास सहाय्यक अनुदान ( खाडी बंदरे विकास) (योजनांतर्गत) ( ३०५६-००-५५) | रु.१,९४,६२,००० | रु.३४,८५,००० |
| एकूण | रु.१७,४०,६२,००० | रु.२,९२,५१,००० |

३. या शासन निर्णयानुसार मंजूर केलेल्या रक्कमेचा अधिदान व लेखा कार्यालयातील लेख्याशी खर्चमेळ करुन महाराष्ट्र बोर्ड अधिनियम १९९६ च्या कलम ८८ अनुसार ताळेबंद तयार करुन कलम ८९ नुसार पुढील कार्यवाहीसाठी शासनाकडे अहवाल सादर करावा.

४. वरील तरतुदीकरीता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून लेखाधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड हे राहतील व मुख्य कार्यकारी अधिकारी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड हे नियंत्रक अधिकारी राहतील आणि महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडे वर्ग केलेली रक्कम अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई यांच्याकडे संबंधित लेखाशिर्षाखाली रक्कमेची मागणी करतील.

५. हा शासन निर्णय गृह विभागाचे अर्थसंकल्प-१ कार्यासनाचे आदेश क्रमांक बीजीटी १००३/३०५१/२००३-२००४/बीयुडी-१, दि.४ एप्रिल, २००३ व आदेश क्रमांक बीजीटी १००३/३०५६/२००३-२००४ दि.४ एप्रिल, २००३ अन्वये सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सुभाष बागवे

( सुभाष बागवे )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

महालेखापाल-१ ( लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल-२, ( लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
अपर मुख्य सचिव ( परिवहन/बंदरे), गृह विभाग.
सचिव, वित्त विभाग ( लेखा व कोषागारे), मुंबई.
मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई ( ५ जादा प्रतीसह)
मुख्य बंदर अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई.
सागरी अभियंता, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई.
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ( व्यय-८, अर्थ-१०),
कक्ष अधिकारी, बीयुडी-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
निवडनस्ती.